यूरी आवेरेन्कोव



# सूर्य तुझाच आहे!

आपल्या शेपटीला आनंदाने एक झटका देऊन कुत्र्याच्या पिल्लाने घरात सूर मारला आणि एक नवी कोरी करवत बाहेर काढली. करवतीची करकर चालू झाली आणि जमिनीवर लाकडाचा भुस्सा पसरला. कुत्र्याचे घर सजीव वस्तूसारखे थरथरले आणि एकदम त्याचे बरोब्बर दोन तुकडे झाले. त्या दोन तुकड्यांच्या मधोमध कुत्र्याचे पिल्लू बसले आणि आपल्या करामतीवर खूष होऊन हसले. त्याच्या अंगभर लाकडाचा भुस्सा चिकटला होता आणि थोडा भुस्सा त्याच्या जिभेवर चिकटला होता.

कोंबडीचे पिल्लू धावत त्याच्याकडे गेले आणि त्याने फुंकर घालताच दोघांच्याही नाकांमध्ये गुदगुल्या झाल्या व ती दोघेही जोरात शिंकली.



"बघ! सारं काम पार पाडलं," कुत्र्याचे पिल्लू म्हणाले. "आता आपल्याला प्रत्येकाला स्वत:चं घर आहे. चल आत जाऊ या."

ती आपापल्या घरात गेली आणि कुत्र्याचे पिल्लू आपल्या पुढील पंजांवर डोके टेकून विसावले.

"काय मस्त कल्पना होती, होय की नाही?" त्याने विचारले.

"होय, मलाही तसं वाटतं," थरथर कापत एका कोपऱ्यात लपण्याचा प्रयत्न करीत कोंबडीचे पिल्लू म्हणाले, कारण एकाएकी हवा थंड झाली होती व काही केल्या त्याला ऊब आणता येत नव्हती.

सूर्य ढगामागे लपला आणि त्याच्याभोवतालचे सारे काळेकुट्ट व कुरूप दिसू लागले. गार वारा वाहू लागला आणि पावसाचे थेंब जमिनीवर कोसळू लागले.

"ए कोंबडीच्या पिल्ला ऽ!" कुत्र्याच्या पिल्लाने हाक मारली.

"काय?" कोंबडीचे पिल्लू अगदी बारीक आवाजात ओरडले.



"आपण दोघे एकमेकांच्या घरांना भेट देऊ या."

"माझी हरकत नाही. पण प्रथम कोण कोणाला भेटणार?"

"तू येऊन मला भेट."

"ठीक आहे!" आणि कोंबडीच्या पिल्लाने पावसात उडी मारली व ते कुत्र्याच्या पिल्लाला भेटायला धावले. पण कुत्र्याच्या पिल्लाच्या घरातही त्याच्या घरासारखीच थंडी वाजत होती आणि मजा येत नव्हती. ती दोघेही एकमेकांना घट्ट बिलगून बसली आणि गप्प राहून काळ्याकुट्ट डबक्यांकडे एकटक पाहू लागली. थंडीमुळे कुत्र्याचे पिल्लू मोठमोठ्यांदा उचक्या देऊ लागले.

"आपण असं करू या?" कोंबडीचे पिल्लू म्हणाले.

"काय?" कुत्र्याच्या पिल्लाने विचारले व पुन्हा जोरात उचकी दिला.

"आपण माझं अर्धं घर तुझ्या घराला जोडू या का? मग आपल्याला सबंध घर होईल आणि आपण त्यात दोघं एकत्र राहू!"

कोंबडीचे पिल्लू हसले आणि त्याच्याबरोबर कुत्र्याचे पिल्लूही हसू लागले. त्यांना एवढा आनंद झाला होता की काही विचारू नका. ती दोघे सारखी हसत सुटली.



तेवढ्यात सूर्य पुन्हा आकाशात चमकू लागला. तो ढगामागून बाहेर आला, त्याने पावसाचे थेंब झटकून टाकले आणि जमिनीवरील त्या छोट्या तपकिरी घरकुलामधून त्याच्याकडे टक लावून पाहणाऱ्या चकचकीत डोळ्यांच्या दोन जोड्या त्याने पाहिल्या. सूर्य त्या घरावरून जाताना खूप खाली झुकला, त्या दोन मित्रांकडे पाहून त्याने मान डोलावली व जंगलापलिकडे तो दिसेनासा झाला.

"तो बघ! तो परत नाहीसा झाला," मावळणाऱ्या सूर्याकडे पहात कोंबडीचे पिल्लू दु:खाने म्हणाले.

"पण तो काही कायमचा गेला नाही," कुत्र्याच्या पिल्लाने धीर देत म्हटले. "तो आपल्याला रोज भेटायला येईल. आता तो आपल्या दोघांचा झालाय, तुझा आणि माझा!"



यूरी आवेरेन्कोव

# सूर्य तुझाच आहे!



प्रगती प्रकाशन

मॉस्को

“हुश्श! आलो बुवा एकदाचा या जगात!” अंड्याच्या कवचामधून डोके बाहेर काढीत कोंबडीचे पिल्लू चिवचिवले. “अरेच्चा! बाहेर एवढा उजेड का?”

त्याने एकदा एकीकडे पाहिले, मग दुसरीकडे पाहिले आणि त्याची नजर वर गेली तशी सूर्याच्या तेजस्वी किरणांनी त्याचे डोळे किलकिले झाले.

“अच्छा! तुझ्यामुळं हा एवढा उजेड पडलाय,” सूर्याला उद्देशून पिल्लू बारक्या आवाजात कुचकुचले. “तू कसा छान चकचकीत आणि माझ्यासारखाच पिवळा आहेस. फक्त तू तिथं वर कुठंतरी आहेस आणि मी खाली आहे एवढाच फरक! म्हणजे तू माझ्याआधी जन्माला आला असावास. नाहीतर एवढं उंच चढून जायला तुला वेळ कसा मिळाला असता?”

पण सूर्याने त्याला काहीही उत्तर दिले नाही. तो नुसता त्याच्याकडे पाहून हसला.

कोंबडीचे पिल्लू धडपडत अंड्यातून बाहेर पडले आणि आपल्या काटकुळ्या तंगड्यांवर उड्या मारीत जवळच्या उबदार गवतावर गेले.



एकाएकी त्याच्या नजरेला एक छोटेसे तपकिरी घर दिसले. त्या घराला मधोमध एक वाटोळे भोक होते. त्या घरातून कुणाचा तरी घोरण्याचा आवाज येत होता.

पिल्लाने आपल्या इवल्याशा चोचीने त्या घराच्या एका बाजूला ठोठावले.

"कू ऽऽ कू! कुणी आत आहे का?" त्याने हाक घातली.

कुणीच उत्तर दिले नाही.

"अरे मला उत्तर दे ना!" पिल्लू पुन्हा ओरडले.

कुणाची तरी चिडकी गुरगुर घरातून ऐकू आली आणि एका कुत्र्याच्या पिल्लाचे केसाळ मुंडके त्या भोकातून बाहेर डोकावले.

"कोण आहेस तू?" कोंबडीच्या पिल्लाने विचारले.

कुत्र्याच्या पिल्लाने झोपाळू नजरेने त्याच्याकडे पाहिले.

"मी या कुत्र्याच्या घराचा मालक आहे. हे घर माझं आहे," कुत्र्याचे पिल्लू म्हणाले.

कोंबडीच्या पिल्लाने गपकन् डोळे मिटले आणि पुन्हा उघडले.

"तू... अं अं.... मालक.... या... या घराचा?"

"होय," जांभई देत कुत्र्याचे पिल्लू म्हणाले.

कोंबडीच्या पिल्लाने त्याला एकदा सावकाशपणे न्याहाळले.

"चल आपण खेळू या," ते म्हणाले.

"तुझ्याजवळ खेळायला काही आहे?"

"न्... न्... नाही."

"नाही? मग काय गंमत?"

"आपण खूप गंमत करू, तू चिंता करू नको. बघ मी काय करतो!"

आणि कोंबडीच्या पिल्लाने खूप वेळा टणाटणा उड्या मारून दाखवल्या.



पण कुत्र्याच्या पिल्लाने पुन्हा एकदा जोरदार जांभई दिली आणि ते घरात गुडुप झाले.

कोंबडीच्या पिल्लाने खूप विचार केला.

"अरेच्चा! मी माझ्या अंड्याच्या कवचाला विसरलोच!" ते ओरडले. "अरे ए; चल बाहेर ये आणि माझं कवच बघ!"

कुत्र्याच्या पिल्लाने एकदा नापसंतीने गुरगुर केली आणि ते घराबाहेर आले.

"यापेक्षा दुसरं काही चांगलं मला दाखवायचं तुला सुचलं नाही का?" त्याने विचारले. "हचॅं! तुझं हे भिकार जुनाट कवच मी एका फटक्यात फोडून टाकीन! हे बघ–हे अस्सं! बघ, त्याचा कसा भुगा झाला!" असे म्हणत त्याने त्या कवचावर पाय आपटून त्याचा चुरा केला.

कोंबडीच्या पिल्लाला खूप वाईट वाटले.

"कवचाशिवाय माझ्याकडं आणखी खूप खूप गोष्टी आहेत," ते म्हणाले. "माझ्याकडं... माझ्याकडं..."



त्याच्या भोवती कितीतरी खजिने होते : हिरवेगार गवत, रंगीबेरंगी फुलपाखरे, सूर्याची हसरी किरणे, चमचमणारी उबदार पाण्याची डबकी !

"माझ्याकडं ... तो आहे !" सूर्याला दाखवीत कोंबडीचे पिल्लू उद्गारले.

कुत्र्याचे पिल्लू मनापासून हसले.

"काय ? सूर्य ? मूर्ख आहेस ! सूर्य कुणाचाच नाही."

"कुणाचाच नाही ?"

"नाही."

"पण .. पण ... मला सांग ... कुत्र्याचं घर कुणाचं ?"

"माझं."

"तुझं?"

"हो."





"आणि सूर्य कुणाचा?"

"कुणाचाच नाही."

"कुणाचाच नाही? मग असं असेल तर मी त्याला माझ्यासाठी घेईन." आणि असे म्हणून कोंबडीचे पिल्लू ऐटीत पावले टाकीत डबक्याकडे निघाले.

"थांब थांब!" सावध होत कुत्र्याचे पिल्लू ओरडले. "तू तुझ्यासाठी सूर्य घेणार म्हणजे काय?"

कोंबडीचे पिल्लू थांबले.

"तुला घर आहे, होय की नाही?"

"अं... हो."

"ते तुझं आहे, होय की नाही?"

"होय."

"मग सूर्य माझा होईल."

'ए, हे बघ, एक मिनिट थांब. मी जर माझं अर्धं घर तुला दिलं ... तर तू सूर्य तुला एकट्याला घेणार नाहीस? घेशील काय?"

"तुझं अर्धं घर? कशाला? ते घेऊन मी काय करू?"

"म्हणजे तुला माहीत नाही?" कुत्र्याच्या पिल्लाने आश्चर्याने विचारले. "ते तुझं होईल. तू तुझ्या अर्ध्या घरात राहशील आणि मी माझ्या अर्ध्या घरात राहीन."

"ठीक आहे," कोंबडीच्या पिल्लाने कबुली दिली.

